रोजंदारी तत्वावर नियुक्त झालेल्या श्री.कैलास ठाकूर व श्री.महारुद्र नगरसाळे यांचे मा. औद्योगिक न्यायालय, जालना यांच्या आदेशानुसार परभणी शहर महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- पमपा-२०१७/प्र.क्र.२०० /नवि-२४**
४ था मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
राजगुरू हुतात्मा चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० एप्रिल, २०२२

**वाचा:-** १. शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१८/प्र.क्र.१२२/नवि-१४ दिनांक ५.२.२०१९.
२. मा.औद्योगिक न्यायालय, जालना यांचे यु.एल.पी. क्र.२७/२००३ मधील, दिनांक २४.८.२००६ रोजीचे निदेश.
३. परभणी शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. कावि-३/आस्था/१४३/२०१८, दिनांक २८.३.२०१८.
४. परभणी शहर महानगरपालिका यांचे पत्रा क्र.कावि-३/आस्था/३५१/२०२१, दिनांक १२.११.२०२१.

**शासन निर्णय :-**

परभणी शहर महानगरपालिकेतील विविध संवर्गातील वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावरील रोजंदारी तत्वावर दिनांक १०.३.११९३ पर्यंत नियुक्त झालेले ३० रोजंदारी कर्मचारी व दिनांक ११.३.११९३ ते दिनांक २७.३.२००० या कालावधीत नियुक्त झालेले ९२ रोजंदारी कर्मचाऱ्यांना नियमित समावेशनास शासन पत्र अनुक्रमे दिनांक १५.१२.२०१८ व दिनांक १४.१.२०२१ रोजी शासनाची मान्यता दिलेली आहे.

**०२.** उपरोक्त प्रस्तावतील नमूद उर्वरित १४ रोजंदारी कर्मचाऱ्यांपैकी श्री.कैलास ठाकूर व श्री. महारुद्र नगरसाळे, रोजंदारी लिपिक यांनी नियुक्तीच्या पदावर २४० दिवस पूर्ण केल्यानुसार त्यांना सेवेत नियमित करण्याचे आदेश दिनांक २४.८.२००६ रोजी मा. औद्यागिक न्यायालय, जालना यांनी पारीत केले होते. सदर आदेशाविरुध्द विहीत मुदतीत परभणी नगरपरिषदेने मा.उच्च न्यायालयात अपिल दाखल केले नसल्यामुळे व तसेच औद्यागिक न्यायालय जालना यांच्या दिनांक २४.८.२०२१ रोजीच्या आदेशाचे अनुपालन केले नसल्यामुळे मा.औद्यागिक न्यायालयांच्या आदेशाचे पालन करणे आवश्यक असल्याचे आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका यांनी त्यांच्या प्रस्तावात नमूद केले आहे.

**०३.** मा.औद्योगिक न्यायालय, जालना यांचे दिनांक २४.८.२००६ मधील निदेश लक्षात घेता, श्री.कैलास ठाकूर व श्री.महारुद्र नगरसाळे, रोजंदारी लिपिक यांना परभणी शहर महानगरपालिकेच्या रिक्त पदावर नियमित परिस्थितीत रोजंदारी कर्मचाऱ्यांची यापुढे नियुक्ती करण्यात येणार नाही. याची जबाबदारी आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका यांची राहिल.

**ब)** पुढील आर्थिक वर्षात महानगरपालिकेचा आस्थापना खर्च ३५ टक्केच्या मर्यादेत येणाच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही सुरु करावी.

**क)** संबंधित रोजंदारी कर्मचाऱ्यांच्या समावेशनानंतर त्यांच्या वेतनाकरीता शासनाकडून कोणताही निधी महानगरपालिकेस मंजूर करण्यात येणार नाही.

**ड)** समावेशन करण्यात आलेल्या सर्व रोजंदारी कर्मचाऱ्यांची नियमित सेवा सर्व प्रयोजनार्थ त्यांच्या समावेशानाच्या दिनांकापासून ग्राह्य धरण्यात यावी तसेच संबंधित रोजंदारी कर्मचाऱ्यांनी या संदर्भात कोणत्याही न्यायालयात दावा दाखल केला असल्यास तो बिनशर्त मागे घेण्यात यावा. समावेशनाचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी उक्त दोन्ही बाबींसदर्भात कर्मचाऱ्यांकडून बंधपत्र घेण्यात यावे.

**इ)** समावेशनाच्या दिनांकापासून संबंधित कर्मचाऱ्यांना सेवाज्येष्ठता, परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन इ. चे लाभ अनुज्ञेय राहतील.

**ई)** समावेशनामुळे त्यांना पूर्वीच्या सेवा कालावधीतील वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक वित्तिय लाभ यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

**०४.** तसेच महानगरपालिका आयुक्तांच्या दिनांक १२.११.२०२१ च्या प्रस्तावातील श्री.कैलास ठाकूर व श्री.महारुद्र नगरसाळे यांना वगळून अन्य १२ रोजंदारी कर्मचारी हे संदर्भ क्र.२ मधील दि.५.२.२०१९ या शासन निर्णयातील धोरणांनुसार नियमित समावेशनासाठी पात्र ठरत नसल्यामुळे त्यांचे नियमित समावेशन करण्यास शासनाची मान्यता देता येणार नाही.

**०५.** उक्त शासन निर्णयाप्रमाणे या प्रकरणी त्वरीत कार्यवाही करून अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२२०४२११५०५४७९१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.04.21 15:07:52 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री.(नगर विकास) यांचे खाजगी सचिव.
२. महापौर, परभणी शहर महानगरपालिका, परभणी.
३. आयुक्त, परभणी शहर महानगपालिका, परभणी.
४. मा.अपर मुख्य सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक.
५. उप आयुक्त (प्रशासन)परभणी शहर महानगरपालिका, परभणी.
६. निवडनस्ती (नवि-२४).